**बारावी पंचवार्षिक योजना २०१२-२०१७ (आदिवासी उपयोजना) व वार्षिक आदिवासी उपयोजना २०१२-१३ ची आखणी करणे**

**प्रशासकीय विभागांबरोबर चर्चा**

**महाराष्ट्र शासन**

**आदिवासी विकास विभाग**

**शासन परिपत्रक क्रमांक : टीएसपी २०११/प्र.क्र.२१३/का.६**

**मंत्रालय विस्तार, मुंबई - ४०००३२**

**दिनांक : १७ ऑक्टोबर,२०११**

वाचा :- नियोजन विभाग अ.शा पत्र क्र. वानियो २०११/प्र.क्र.३१/१४११, दिनांक ४ ऑगस्ट,२०११

**परिपत्रक :-**

बारावी पंचवार्षिक योजना सन २०१२-१७ व वार्षिक योजना सन २०१२-१३ अंतर्गत आदिवासी उपयोजना ही आदिवासी विकास विभागामार्फत तयार करण्यात येईल . या संबंधिचे आपले प्रस्ताव आदिवासी विकास विभागाकडे पाठवावेत.वार्षिक आदिवासी उपयोजना २०११-२०१२ प्रमाणेच वार्षिक आदिवासी उपयोजना २०१२-१३ तयार करताना विभागांनी क्षेत्र/ उपक्षेत्र विचारात घेऊन त्याखाली येणाऱ्या योजनांसाठी निधी मागणी करावी. पंचवार्षिक योजना २०१२-२०१७ व वार्षिक आदिवासी उपयोजना आखणीबाबतचे सर्वसाधारण वेळापत्रक सोबतच्या परिशिष्ट-१ मध्ये दर्शविले आहे.

२. राज्याला केंद्र शासनाकडून केंद्र पुरस्कृत योजना व केंद्र सहाय्यित योजना या दोन प्रकारे निधी उपलब्ध होतो. त्यापैकी, केंद्र पुरस्कृत योजनेच्या (CSS) हिश्श्यासाठी राज्य/जिल्हा योजनेतून तरतूद करण्यात यावी. मात्र केंद्र हिश्श्याची तरतूद योजनाबाह्य राहिल. तसेच केंद्र सहाय्यित योजनेची (CAS) व वित्त आयोगाची योजनांतर्गत बाबीची संपूर्ण तरतूद राज्य योजनेतून करण्यात यावी. यानुसार योजनेच्या एकूण नियतव्ययात केंद्र पुरस्कृत योजनेचा राज्य हिस्सा (State Share for CSS), केंद्र सहाय्यित योजना (CAS) , जागतिक बँक/ बाह्य सहाय्यित योजना (EAP), अंतर्गत वित्तीय संस्थांकडून (DFI) अर्थसहाय्य प्राप्त होणाऱ्या योजना यांचा समावेश राहिल.

३. **<u>मार्गदर्शक सूचना</u>** - बारावी पंचवार्षिक योजना २०१२-२०१७ व वार्षिक आदिवासी उपयोजना २०१२-१३ ची आखणी करताना खाली नमूद केलेल्या मार्गदर्शक सूचनांप्रमाणे कार्यवाही करण्यात यावी :-

१) नवीन योजना अंतर्भूत करावयाच्या असल्यास आदिवासी विभाग व वित्त विभाग यांची मान्यता घेण्यात यावी. सदर प्रस्तावास मंत्रिमंडळाची मान्यता घेणे आवश्यक राहिल.

२) निधीची मागणी करताना खालील बाबी विचारात घ्याव्यात :-

- केंद्र शासनाकडून अर्थसहाय्य मिळणाऱ्या योजना, तसेच राज्याच्या निधी व्यतिरिक्त इतर ठिकाणाहून सहाय्य मिळणाऱ्या योजनांसाठी प्राधान्याने निधीची मागणी करण्यात यावी.
- मा.राज्यपालांच्या प्रचलित निदेशानुसार वैधानिक विकास मंडळ निहाय निधीची मागणी करण्यात यावी.

- शासनाने घेतलेल्या धोरणात्मक निर्णयानुसार जाहिर करण्यात आलेल्या पॅकेजेस करिता आवश्यक निधीची मागणी करावी.
- माहिती प्रणालीतील जीएन -२-ए विवरणपत्रामध्ये दर्शविण्यात आलेली विभागाकडे सुरु असलेली जुनी कामे पूर्ण करण्यासाठी आवश्यक कालावधी व निधी यांचा आढावा घेऊन त्यानुसार निधीची मागणी करण्यात यावी.
- ज्या आदिवासी पाडयामध्ये पिण्याच्या पाण्याची सोय नाही अशा पाडयाच्या पिण्याच्या पाण्याची सोय करण्यासाठी,विद्युतीकरण न झालेली गावे अशा गावांसाठी निधी प्रस्तावित करावा,विभागांतर्गत राबविण्यात येणाऱ्या पायाभूत सुविधा निर्माण करणाऱ्या व समूह विकासासाठी घ्यावयाच्या योजनांसाठी निधी प्रस्तावित करावा.
- ज्या आदिवासी शेतकऱ्यांना जमिनीच्या पट्टयांचे वाटप करण्यात आले आहे. अशा आदिवाशी शेतकऱ्यांना कृषी विषयक उद्योगधंदे उपलब्ध करुन देणाऱ्या योजनांसाठी नियतव्यय प्रस्तावित करण्यात यावा.
- पुढील पाच वर्षात सर्व आदिवासी कुटुंबांना इंदिरा आवास योजनेतंर्गत घरकुल उपलब्ध करुन देण्यासाठी आवश्यक नियतव्यय प्रस्तावित करणे.
- पुढील पाच वर्षात सर्व शासकीय आश्रमशाळा व वसतीगृहांना जमीन उपलब्ध करुन घेऊन सुसज्ज अशी इमारत बांधण्यासाठी नियतव्यय प्रस्तावित करणे.
- पुढील पाच वर्षात आदिवासी क्षेत्रातील सर्व मुलांना शिक्षणांची सोयी सुविधा उपलब्ध होईल यासाठी आवश्यक नियतव्यय प्रस्तावित करणे.

४. **जिल्हा योजना :-** सन २०१२-१३ ची जिल्हा वार्षिक आदिवासी उपयोजना तयार करणे याबाबतची मार्गदर्शक तत्वे विभागाच्या दि.१८ ऑगस्ट २०११ च्या शासन परिपत्रकान्वये निर्गमित करण्यात आले आहे.

५. **नक्षलग्रस्त भागाचा विकास :-** नियोजन विभागाच्या दि.३१ मे २००९ च्या शासन निर्णयान्वये नक्षलग्रस्त भागाच्या विकासाकरीता ३ वर्षाचा कालबाहय कार्यक्रम निश्चित केला आहे. यातील काही बाबी सन २०१२-१३ मध्ये चालू राहणार असल्यास त्या अनुषंगाने सन २०१२-१३ या वर्षाची वार्षिक आदिवासी उपयोजना करताना त्या दृष्टीने नियोजन करुन त्यानुसार या कार्यक्रमासाठी आवश्यक असलेल्या निधीची मागणी विभागाने प्राधान्याने करावी.

६. वार्षिक आदिवासी उपयोजना २०११-१२ मध्ये जीएन -३ मध्ये दर्शविण्यात आलेल्या योजनांचे बाब, परिमाण व उद्दिष्ट याचा आढावा घेऊन त्यानुसार तपशिलवार माहिती उपलब्ध करावी. सन २०१२-१३ साठी निधी मागणी करताना उद्दिष्टपूर्ती विचारात घेऊनच मागणी करणे आवश्यक आहे.

७. **योजना तयार करण्याची कार्यपध्दती :-** प्रशासकीय विभागांनी वार्षिक आदिवासी उपयोजना २०१२-१३ तयार करताना विभागांनी नवीन योजनांची परिपूर्ण माहिती MPSIMS मध्ये भरावी. सन २०११-१२ मधील जुन्या योजना चालू ठेवायच्या असतील तर पुन्हा स्कीम प्रोफाईल भरण्याची आवश्यकता नाही. पंचवार्षिक योजना २०१२-१७ साठी व त्यातून फक्त २०१२-१३ साठी आवश्यक असलेल्या निधीची मागणी योजना माहिती प्रणालीवर भरावी. मात्र नवीन योजना अंतर्भूत करावयाचे असल्यास स्कीम प्रोफाईल, MPSIMS योजना माहिती प्रणालीवर भरावी. मात्र नवीन योजना अंतर्भूत करावयाचे असल्यास स्कीम प्रोफाईल, MPSIMS योजना माहिती प्रणालीवर भरणे आवश्यक आहे. सदर माहिती save करुन नियोजन विभागाला/ (यथास्थित आदिवासी विकास विभागाला) submit करावी. त्यानंतर त्याची छापील प्रत घेऊन सचिवांच्या मान्यतेने प्रस्ताव आदिवासी विकास विभागाकडे पाठविण्यात यावा. जुन्या व नव्या योजनांची MPSIMS प्रणालीवरील माहिती परिपूर्ण व अचूक नोंदविलेले आहेत. त्याची द्विरुक्ती झालेली

नाही,याची खातरजमा विभागांनी वारंवार करुन घ्यावी. नवीन योजनांना प्राप्त होणारे लेखाशिर्ष सांकेतांक संबंधित योजनेसमोर वेळीच MPSIMS प्रणालीवर नोंदवावेत. हे सर्व प्रस्ताव प्राप्त झाल्यानंतर त्याची छाननी सचिव स्तरीय व मंत्री स्तरीय बैठकीत करण्यात येईल व एकत्रित प्रस्ताव मंत्रिमंडळ नियोजन उपसमितीसमोर सादर करण्यात येईल. आदिवासी उप योजनेबाबत आवश्यक ती कार्यवाही आदिवासी विकास विभागाकडून करण्यात येईल. मंत्रिमंडळ नियोजन उपसमितीच्या मान्यतेनंतर सर्व विभागांना त्यानुसार निधीचे वाटप करण्यात येईल. तद्नंतर विभागांनी त्यांना उपलब्ध करण्यात आलेल्या नियतव्ययाचे योजनानिहाय वाटप करुन आदिवासी विकास विभागाला सादर करावे. त्याआधारे पंचवार्षिक योजना २०१२-१७ व वार्षिक आदिवासी उपयोजना सन २०१२-१३ चे प्रारुप आराखडे तयार करुन आदिवासी विकास विभागाकडून नियोजन विभागामार्फत योजना आयोगास मंजूरीसाठी सादर करण्यात येतील. योजना आयोगाकडून मंजूर झालेल्या आकारमानानुसार विभागांना प्रारुप योजनेत बदल झाल्यास तसेच प्रशासकीय विभागाना कळविण्यात येईल. त्याप्रमाणे विभागांनी MPSIMS प्रणालीत त्यांच्या योजनानिहाय वाटपास सुधारणा करणे आवश्यक राहील.

८. वार्षिक आदिवासी उपयोजनेत त्यापूर्वीच्या वार्षिक योजनांमधील प्रत्यक्ष/ अपेक्षित खर्च ही नमूद केला जातो. सबब, सन २०१०-११ पर्यन्तचा प्रत्यक्ष खर्च व सन २०११-१२ चा अपेक्षित खर्च प्रत्येक योजनेसमोर अचूकपणे नमूद करण्यात यावा. ( सोबत जोडलेल्या विवरणपत्रात या विभागास माहिती सादर करण्यात यावी.)

९. पंचवार्षिक योजना २०१२-२०१७ तसेच वार्षिक आदिवासी उपयोजना २०१२-१३ बाबत योजना आयोगाने विहित/निश्चित केलेली उद्दिष्टे व मार्गदर्शक सूचना नंतर कळविण्यात येतील. त्यानुसार काही सुधारणा करावयाच्या झाल्यास त्या तातडीने कराव्यात. पंचवार्षिक योजना २०१२-२०१७ तसेच वार्षिक आदिवासी उपयोजना २०१२-१३ ची आखणी विहित वेळापत्रकानुसार पूर्ण करणे शक्य व्हावे म्हणून सर्व प्रशासकीय विभागांनी आदिवासी विकास विभागास कृपया सहकार्य करावे.

सदर शासन परिपत्रक महाराष्ट्र शासनाच्या वेबसाईटवर प्रसिध्द करण्यात आले असून त्याचा संगणक सांकेतांक क्रमांक २०१११०१७१४१६५९००१ असा आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

चं.ज.देशपांडे

**( चं. ज. देशपांडे )**
**उप सचिव**

**प्रति,**

मा.मुख्य सचिव, मंत्रालय,मुंबई - ४०० ०३२
सर्व प्रशासकीय विभागाचे अपर मुख्य सचिव/प्रधान सचिव/ सचिव
मंत्रालय,मुंबई - ४०० ०३२

**प्रत,**

१. सर्व प्रशासकीय विभागातील नियोजन/अर्थसंकल्पिय शाखेशी संबंधित सह सचिव/उप सचिव यांना आवश्यक त्या कार्यवाहीसाठी अग्रेषित.

२. आदिवासी विभागातील सर्व सह/ उप सचिव/ अवर सचिव/ कक्ष अधिकारी यांना आवश्यक त्या कार्यवाहीसाठी अग्रेषित. त्यांनी समन्वय असणाऱ्या संबंधित प्रशासकीय विभागाकडून दि. ५ नोव्हेंबर २०११ पर्यन्त योजनेसंबंधी आवश्यक ती माहिती भरुन घ्यावी.

३. आयुक्त, आदिवासी विकास,नाशिक

४. सर्व अप्पर आयुक्त,ठाणे/ नाशिक/ नागपूर/ अमरावती

५. उप सचिव (नियोजन/अर्थसंकल्प), आदिवासी विभाग

६. निवडनस्ती

**प्रत माहितीकरिता अग्रेषित -**

१) मा.राज्यपालांचे सचिव

२) मा.मुख्यमंत्री यांचे खाजगी सचिव

३) मा. उप मुख्यमंत्री यांचे खाजगी सचिव

४) मा.मंत्री (आ.वि) यांचे खाजगी सचिव

५) मा. राज्यमंत्री (आ.वि.) यांचे खाजगी सचिव

६) मा.राज्यमंत्री (नियोजन) यांचे खाजगी सचिव

७) मा.उपाध्यक्ष राज्य नियोजन मंडळ यांचे खाजगी सचिव

## परिशिष्ट - १

## बारावी पंचवार्षिक (आदिवासी उपयोजना ) सन २०१२ - २०१७
## सर्वसाधारण वेळापत्रक

| अ.क्र. | कार्यवाही | दिनांक |
|---|---|---|
| १ | पंचवार्षिक योजना २०१२-१७ व वार्षिक आदिवासी उपयोजना २०१२-१३ च्या आखणीबाबत प्रशासकीय विभागांबरोबर चर्चा, विभागाच्या मागण्यांच्या अनुषंगाने सचिव स्तरीय/ मंत्री स्तरीय बैठका घेणे. | १७ ऑक्टोबर २०११ ते ११ नोव्हेंबर,२०११ |
| २ | विभागनिहाय प्रस्तावित वाटप मंत्रीमंडळ नियोजन उपसमितीसमोर ठेवणे | ११ - १९ नोव्हेंबर २०११ (अपेक्षित) |
| ३ | मंत्रीमंडळ नियोजन उपसमितीने मान्य केलेले निधीचे वाटप विभागांना कळवून, त्यांचेकडून संगणक प्रणालीवर योजनानिहाय तपशील भरुन घेणे. (नक्षल भागाचा विकास, महिला व बाल विकास, मानव विकास, मंडळनिहाय, खाजगी संस्थांचा सहभाग, इ.बाबींचाअंतर्भाव असावा. | १९ - २५ नोव्हेंबर २०११ (अपेक्षित) |
| ४ | पंचवार्षिक योजना (आदिवासी उपयोजना) २०१२-१७ अंतिम प्रारुप आराखडा नियोजन विभागाकडे पाठविणे. | २८ नोव्हेंबर,२०११ |
| ५ | वार्षिक आदिवासी उपयोजना मंत्रिमंडळ नियोजन उपसमितीसमोर ठेवणे. | १५ फेब्रुवारी,२०१२ |
| ६ | मंत्रिमंडळ नियोजन उपसमितीच्या मान्यतेनंतर अंतिम योजना विभागाकडून संगणक प्रणालीवर भरुन घेणे. नियोजन विभागास अंतिम आराखडा पाठविण्यात येईल. | २८ फेब्रुवारी,२०१२ |

# विवरणपत्र

## वार्षिक आदिवासी उपयोजना सन २०१२ - १३ व १२ वी पंचवार्षिक योजना सन २०१२ - १७

प्रशासकीय विभाग -

| अ.क्र. | योजनेचा स्तर | योजनेचे नाव व लेखाशिर्ष | सन २०१०-११ चा खर्च | सन२०११-१२ साठी अर्थसंकल्पित तरतूद | सन २०१२-१३ साठी प्रस्तावित नियतव्यय | १२ व्या पंचवार्षिक सन २०१२-१७ साठी प्रस्तावित नियतव्यय | योजनेबाबतची संक्षिप्त माहिती |
|---|---|---|---|---|---|---|---|
| | राज्यस्तर | | | | | | |
| | | | | | | | |
| | | | | | | | |
| | जिल्हास्तर | | जिल्हास्तरीय योजनांची फक्त नाव व लेखाशिर्ष नमूद करण्यात यावे. | | | | |
| | | | | | | | |
| | | | | | | | |

सह सचिव/ उप सचिव
विभाग,महाराष्ट्र शासन

D:\Excel & Word Files C.R.213 TSP